कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावत असताना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू पावलेल्या कर्मचाऱ्यांच्या कुटुंबियांना सानुग्रह सहाय्य मंजूर करण्याबाबत.
कै.सज्जन ज्ञानदेव कांबळे, परिचर

**महाराष्ट्र शासन**
**सार्वजनिक आरोग्य विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः संकिर्ण-२०२३/प्र.क्र.५५९/सेवा-५**
१० वा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय इमारत संकुल, क्रॉफर्ड मार्केट जवळ,
लोकमान्य टिळक मार्ग, मंत्रालय, मुंबई - ४०० ००१.
**दिनांक: ०४ जुलै, २०२४**

**वाचा :-**

१. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दिनांक २९.०५.२०२०.
२. संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांचे पत्र क्र.ससंआसे/कोवीड-१९/कक्ष-५८/विककैकांबळे/१६४-१६९/२४, दि.२०.०५.२०२४

**शासन निर्णय :-**

संदर्भाकित क्रमांक १ येथील वित्त विभाग, शासन निर्णय, दि.२९.०५.२०२० अन्वये कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य बजावतांना कोव्हिड-१९ विषाणूचा संसर्ग होऊन मृत्यू होणाऱ्या कर्मचाऱ्यांना विमा कवच / सानुग्रह सहाय्य लागू करण्याबाबत निर्णय घेण्यात आला आहे.

२. संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांनी मयत श्री.सज्जन ज्ञानदेव कांबळे, परिचर, प्रा.आ.केंद्र गादेगाव, ता.पंढरपूर, जि.सोलापूर यांच्या कुटुंबियांना वित्त विभाग, शासन निर्णय क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.४/व्यय-९, दि.२९.०५.२०२० नुसार रु.५०,००, ०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेच्या सानुग्रह सहाय्य मंजूरीचा प्रस्ताव सादर केला आहे.

३. प्रा.आ.केंद्र गादेगाव, ता.पंढरपूर, जि.सोलापूर येथे कार्यरत असलेल्या मयत श्री.सज्जन ज्ञानदेव कांबळे, परिचर यांचा कोव्हिड-१९ संबंधित कर्तव्य पार पाडताना कोरोना विषाणू संसर्गाने दि.०४.०८.२०२० रोजी मृत्यू झाला आहे. मयत श्री.कांबळे यांच्या सेवा कोव्हिड-१९ विषाणूच्या सार्वत्रिक साथीच्या अनुषंगाने मदतकार्य यामध्ये समाविष्ट होत आहेत. मयत श्री.कांबळे हे रुग्णालयात दाखल होण्यापूर्वी १४ दिवस कर्तव्यावर हजर होते. श्री.कांबळे यांचा मृत्यू कोव्हिड-१९ मुळे झाला

असल्याचे प्राध्यापक व विभागप्रमुख औषधवैद्यकशास्त्र विभाग, डॉ.वै.स्मृ.शा.वैद्य.महा.सोलापूर यांनी प्रमाणित केले आहे.

४. त्यानुसार, प्रा.आ.केंद्र गादेगाव, ता.पंढरपूर, जि.सोलापूर येथे कार्यरत असलेल्या मयत श्री.सज्जन ज्ञानदेव कांबळे, परिचर यांच्या कुटुंबियांना रु.५०,००,०००/- (रुपये पन्नास लक्ष फक्त) इतक्या रक्कमेचे सानुग्रह सहाय्य प्रदान करण्यास या आदेशाद्वारे मंजूरी देण्यात येत आहे.

५. वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.संकिर्ण-२०२०/प्र.क्र.व्यय-९, दि.२९.०५.२०२० मधील तरतूदीनुसार मयत श्री.सज्जन ज्ञानदेव कांबळे, परिचर या कर्मचाऱ्यांच्या वारसास या संदर्भातील तरतूदी व नियम विचारात घेऊन सानुग्रह सहाय्य अदा करण्याची जबाबदारी संचालक, आरोग्य सेवा, पुणे यांची राहील.

६. प्रस्तुत खर्च **२२१०-५०४१ (८PHC)** या लेखाशिर्षाखाली मंजूर अनुदानातून भागविण्यात येईल.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक **२०२४०७०४१२४५५९५३१७** असा आहे. सदर शासन निर्णय हा डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

ANIL MAHADEV KUMERIYE

Digitally signed by ANIL MAHADEV KUMERIYE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=PUBLIC HEALTH DEPARTMENT, 2.5.4.20=7de2c699c260e8b545f2736f6acef82da11a2da0a65565e5bcb99995bc112fe6, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C4770170FA4EC3BAEC96D0FA6B787BC46960639B94799F693E5F126CA6F1AF70, cn=ANIL MAHADEV KUMERIYE
Date: 2024.07.04 18:00:41 +05'30'

**(अनिल कुमेरीये)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता /लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१/२, मुंबई/नागपूर.
२. आयुक्त, आरोग्य सेवा तथा अभियान संचालक, राष्ट्रीय आरोग्य अभियान, मुंबई.
३. संचालक, आरोग्य सेवा-१, आरोग्य सेवा आयुक्तालय, मुंबई.
४. संचालक, आरोग्य सेवा-२, आरोग्य सेवा संचालनालय, पुणे.
५. सहाय्यक संचालक (लेखा व लेखापरिक्षा), आरोग्य सेवा, पुणे.

६. उपसंचालक, आरोग्य सेवा, पुणे मंडळ, पुणे.
७. वित्त विभाग (विनियम कार्यासन), मंत्रालय, मुंबई.
८. अवर सचिव (अर्थसंकल्प/लेखा), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. श्रीमती रंजना सज्जन कांबळे, रा.आढीव पो.गुरसाळे ता.पंढरपूर, जि.सोलापूर.
१०.निवडनस्ती, सार्वजनिक आरोग्य विभाग (सेवा-५).